"महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाच्या कल्याण केंद्र इमारतीच्या बांधकामासाठी निधी देणे" या नवीन योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी घोषित करणे...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संघटना १५१७ /प्र.क्र.२०२/१६-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २४ मार्च, २०२३

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. संघटना १५१५/प्र.क्र.१७७/१६-अ,दि.०१.०४.२०१७
२) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा यांचे पत्र क्र.- राज.अधि.महासंघ.कल्याण केंद्र/२०२२, दि.२६.१२.२०२२

**प्रस्तावना-**

संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघास राज्य शासनाच्या सेवेतील अधिकारी मुंबई येथे शासकीय कामकाजानिमित्त आल्यानंतर त्यांच्या निवासाची व विश्रामाची सोय करण्याकरिता, तसेच महासंघाच्या सदस्यांकरिता विविध प्रशिक्षण व मार्गदर्शनपर शिबिरे आयोजित करण्याकरिता कल्याणकेंद्र उभारण्यासाठी मौजे वांद्रे, ता. अंधेरी, जि. मुंबई उपनगर येथील स.नं.३४१, न.भू.क्र. ६२९ मधील "ई", क्षेत्र १३८१ चौ.मी. क्षेत्राचा भूखंड रूपये १/- (अक्षरी रूपये एक) नाममात्र प्रतीवर्षी भाडयाने ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने मंजूर करण्यात आला आहे. महासंघाच्या प्रस्तावित कल्याणकेंद्राच्या बांधकामासाठी शासनाकडून विशेष बाब व एक वेळची मदत म्हणून ₹१० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध करून देण्यास, विहित मार्गदर्शक तत्वे, अटी व शर्ती तसेच कार्यपध्दतीच्या अधिन राहून वितरीत करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे.

कल्याणकेंद्राच्या उभारणीकरिता आवश्यक असलेल्या सर्व परवानग्या, ना-हरकत दाखले, तसेच संबंधित सक्षम स्थानिक प्राधिकरणाकडून बांधकाम आराखड्यासह सर्व बाबींची मंजूरी / मान्यता व पर्यावरण विभागाकडून आवश्यकतेनुसार मंजूरी प्राप्त करुन त्या सर्व कागदपत्रांच्या प्रती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे सादर केल्यानंतर बांधकाम मान्यता देणे व निधी वितरीत करणे अपेक्षित असल्याने सदर प्रकल्पावर अद्याप निधी वितरीत करण्यात आलेला नाही. महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांनी दिनांक ३१.५.२०२२ रोजीच्या पत्रान्वये, भूखंडाचा ताबा घेतल्याचे दिनांक ०४.०३.२०१० चे पावतीपत्र व बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून दिनांक २७.०५.२०२२ रोजीचे बांधकामासाठी प्रारंभ प्रमाणपत्र (CC) तसेच अन्य कागदपत्रे सादर केले असून निधी वितरणाबाबत विनंती केली आहे.

जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी संदर्भ क्रमांक २ अन्वये सदर प्रकल्पासाठी गठित केलेल्या संनियंत्रण व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष या नात्याने प्रकल्पासाठी आवश्यक निधी वितरीत करण्यास दिनांक २१.११.२०२२ रोजीच्या बैठकीत सर्वानुमते मान्यता देण्यात आल्याचे नमूद केले आहे. तसेच, कल्याणकेंद्राच्या स्थापत्य कामाच्या एकूण रु.४८,९१,८९,०५२/- (रूपये अठ्ठेचाळीस कोटी एक्क्यान्नव लाख एकोण नव्वद हजार बावन्न) इतक्या तसेच विद्युत कामाच्या मुख्य अभियंता (विद्युत) यांनी एकूण रु.११,४४,९२,६३७/- (रूपये अकरा कोटी चव्वेचाळीस लाख ब्यान्नव हजार सहाशे सदतीस) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी दिल्याचे नमूद केले आहे. तसेच, पुढील निविदा प्रक्रियेची कार्यवाही करण्यात येत असल्याबबत नमूद केले आहे.

सदर प्रकल्पाच्या संदर्भ क्रमांक-१ रोजीच्या शासन निर्णयातील अट क्रमांक ३ नुसार प्रकल्पाचा निधी हा जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या PLA खात्यामध्ये वर्ग करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. तथापि या संदर्भात महालेखापाल कार्यालयाने "महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र.४९५ अनुसार स्वीय प्रपंजी लेखा खात्यात जमा करण्यात येणारी रक्कम ही एकत्रित निधीमध्ये खर्च दाखवून जमा करण्यात येणार असल्याने वर्षाच्या अखेरीस स्वीय प्रपंजी लेखा खात्यातील अखर्चित रक्कम संबंधित लेखाशिर्षाखाली वजा खर्च दाखवून पुन्हा एकत्रित निधीत जमा करून, आवश्यकता भासल्यास पुढील वर्षी पुन्हा नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडून पूर्वीप्रमाणे कार्यवाही करणे आवश्यक असते. सबब स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्या ऐवजी प्रतिवर्षीच्या कामाच्या प्रगती नुसार आवश्यक मान्यता घेवून अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्च करण्यात यावा असे अभिप्राय दिले आहेत. सदर अभिप्राय विचारात घेवून वित्त विभागाने त्यास सहमती दर्शविली आहे.

उपरोक्त प्रकरणी संदर्भ क्र. २ अन्वये सादर प्रस्ताव विचारात घेता, निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता प्रकल्पावर प्रत्यक्ष खर्च विचारात घेऊन निधी वितरीत करण्याबाबत मान्यता देण्यात आली आहे. तसेच काही अटी व शर्तीच्या अधीन राहून, सदर प्रकल्पासाठी PLA खात्या ऐवजी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर व संनियंत्रण समिती सदस्य तथा मुंबई उपनगर येथील महासंघाचे उपाध्यक्ष यांचे संयुक्त खाते उघडणे, प्रकल्पासाठी आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघास कल्याण केंद्राच्या बांधकामासाठी शासनामार्फत एक वेळचे सहाय्य या प्रकल्पासाठी कोषागारातून निधी आहरीत करण्यासाठी निवासी उप जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संबंधित अधिकारी यांनी त्यांना संदर्भ क्र.१ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार सर्व जबाबदाऱ्या पार पाडाव्यात.

सदर प्रकल्पासाठी संदर्भ क्रमाकं-१ मधील स्वीय प्रपंजी लेखा खात्यासंदर्भातील अट क्रमांक ३ वगळण्यात येत आहे. आता जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर व संनियंत्रण समिती सदस्य तथा मुंबई उपनगर येथील महासंघाचे उपाध्यक्ष यांचे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून संयुक्त खाते उघडण्यात मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदर संयुक्त खात्यात शासन अर्थसहाय्य तसेच महासंघाचा हिस्सा जमा करण्यात यावा.
२. सदर खात्यातून रक्कम वितरीत करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या मान्यतेने आहरण व संवितरण अधिकारी यांनी महासंघास प्रकल्पासाठी निधी वितरीत करावा.
३. सदर संयुक्त बँक खाते बंद करण्यात आल्यास सदर खात्यावरील व्याजाची रक्कम तसेच शिल्लक रक्कम याचा ताळमेळ घेऊन निश्चित होणारी रक्कम जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी शासकीय लेख्यामध्ये तात्काळ जमा करावी.

४. सदर संयुक्त बँक खात्यात दीर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही या दृष्टीने तात्काळ विनियोगासाठी आवश्यक असेल त्याचवेळी कोषागारातून निधी आहरीत करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३६/२०२३/को. प्र ५ दिनांक २३.२.२०२३ व अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०२३०३२४१७४८४४७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAWANSHI
SAMPAT DASHARATH

Digitally signed by SURYAWANSHI SAMPAT DASHARATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e2d0677dc3b9f523d6452edd479c3b2edc0887c9102b4130ae3ef3dd803b7322, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F8D5F07D73B60D73112565DB9BAEE680FFADE9B8758D5A695368E1D3656632DD, cn=SURYAWANSHI SAMPAT DASHARATH
Date: 2023.03.24 20:11:37 +05'30'

**( सं. द. सुर्यवंशी )**
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०० ०३५.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व सन्माननीय विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र राज्य.
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. प्रधान सचिव,नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
१३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग
१४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई
१५. निवासी उप जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई
१६. सरचिटणीस, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, तळमजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
१७. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
१८. संचालक,लेखा व कोषागारे, मुंबई
१९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२०. निवड नस्ती/कार्या.१६-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.